सातारा जिल्ह्यातील पश्चिम घाट परिसरातील धार्मिक, ऐतिहासिक व निसर्ग पर्यटनस्थळे विकासाचा एकात्मिक पर्यटन विकास आराखडा Western Ghat Integrated Religious, Historical, Eco-Tourism Circuit Plan - अंतर्गत श्री क्षेत्र महाबळेश्वर प्रतापगड किल्ला जतन व संवर्धन, सहयाद्री व्याघ्र राखीव वनक्षेत्रातील पर्यटन विकास व कोयना हेळवाक वन झोन अंतर्गत कोयना नदी जलपर्यटन विकास आराखड्यासाठी लेखाशिर्षास मंजूरी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः तिक्षेवि-२०२३/प्र.क्र.१६/का.१४४४-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: २१ जून, २०२४.

वाचा: १) नियोजन विभाग, शासन निर्णय, क्र. तिक्षेवि-२०२३/प्र.क्र.१६/का.१४४४-अ, दिनांक ०५/०३/२०२४.
२) नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांकः तिक्षेवि-२०२३/प्र.क्र.३४/का.१४४४-अ, दिनांक १२/०३/२०२४

**प्रस्तावना:**

नियोजन विभाग शासन निर्णय क्र. तिक्षेवि-२०२३/प्र.क्र.१०२/का.१४४४-अ, दिनांक ३०/११/२०२३ अन्वये “सातारा जिल्ह्यातील पश्चिम घाट परिसरातील धार्मिक, ऐतिहासिक व निसर्ग पर्यटनस्थळे विकासाचा एकात्मिक पर्यटन विकास आराखडा Western Ghat Integrated Religious, Historical, Eco-Tourism Circuit Plan - अंतर्गत श्री क्षेत्र महाबळेश्वर प्रतापगड किल्ला जतन व संवर्धन, सहयाद्री व्याघ्र राखीव वनक्षेत्रातील पर्यटन विकास व कोयना हेळवाक वन झोन अंतर्गत कोयना नदी जलपर्यटनच्या” रुपये ३८१.५६ कोटी किंमतीच्या आराखड्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. हा आराखडा सन २०२३-२४ पासून अंमलात येत आहे. सदर आराखड्यांतर्गत करण्यात येणाऱ्या कामांवर होणारा खर्च भागविण्यासाठी नवीन लेखाशीर्ष उघडण्यात येत आहे. तसेच वित्तीय तरतूद व लेखाशीर्ष याबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील असे उक्त शासन निर्णयामध्ये नमूद करण्यात आले आहे.

२. दरम्यान यापुढे प्रत्येक आराखड्याकरीता स्वतंत्र महसुली व भांडवली लेखाशिर्ष न घेता सर्व आराखड्यांसाठी एक महसुली व भांडवली लेखाशिर्ष करण्याचे धोरण शासनस्तरावरुन निश्चित करण्यात आले असल्यामुळे यापुढे नियोजन विभागामार्फत प्रशासकीय मान्यता देण्यात येणाऱ्या तीर्थक्षेत्र व पर्यटनस्थळ विकास आराखड्यांसाठी उपरोक्त वाचा येथील क्र.२ अन्वये नवीन लेखाशीर्षास मंजूरी देण्यात आली आहे.

३. आता उक्त क्र. १ व २ च्या अनुषंगाने "सातारा जिल्ह्यातील पश्चिम घाट परिसरातील धार्मिक, ऐतिहासिक व निसर्ग पर्यटनस्थळे विकासाचा एकात्मिक पर्यटन विकास आराखडा Western Ghat Integrated Religious, Historical, Eco-Tourism Circuit Plan - अंतर्गत श्री क्षेत्र महाबळेश्वर प्रतापगड किल्ला जतन व संवर्धन, सहयाद्री व्याघ्र राखीव वनक्षेत्रातील पर्यटन विकास व कोयना हेळवाक वन झोन अंतर्गत कोयना नदी जलपर्यटन विकास आराखडयांतर्गत" करण्यात येणाऱ्या कामांवर होणारा खर्च भागविण्यासाठी लेखाशीर्षास मंजूरी देण्याची बाब विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

"सातारा जिल्ह्यातील पश्चिम घाट परिसरातील धार्मिक, ऐतिहासिक व निसर्ग पर्यटनस्थळे विकासाचा एकात्मिक पर्यटन विकास आराखडा Western Ghat Integrated Religious, Historical, Eco-Tourism Circuit Plan - अंतर्गत श्री क्षेत्र महाबळेश्वर प्रतापगड किल्ला जतन व संवर्धन, सहयाद्री व्याघ्र राखीव वनक्षेत्रातील पर्यटन विकास व कोयना हेळवाक वन झोन अंतर्गत कोयना नदी जलपर्यटन विकास आराखडयांतर्गत" करण्यात येणाऱ्या कामांवर होणारा खर्च, नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांकः तिक्षेवि-२०२३/प्र.क्र.३४/का.१४४४-अ, दिनांक १२/०३/२०२४ अन्वये मंजूरी देण्यात आलेल्या खाली नमूद लेखाशीर्षातून भागविण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

भांडवली खर्चासाठी लेखाशीर्ष :

| मागणी क्र. ओ-१० (भांडवली खर्च) | | | |
|---|---|---|---|
| ५४५२, | पर्यटनावरील भांडवली खर्च | 5452 | Capital outlay on Tourism |
| ०१, | पर्यटनासाठी पायाभूत सुविधा | 01 | Tourist Infrastructure |
| १०१ | पर्यटन केंद्र | 101 | Tourist Centres |
| ०० | | 00 | |
| (००) (१५) | "तीर्थक्षेत्र व पर्यटनस्थळ विकास आराखडा" (कार्यक्रम/दत्तमत) (५४५२०२११) | (००)(15) | "Pilgrimage And Tourism Destination Development Plan" (Scheme/Voted) (54520211) |

महसूली खर्चासाठी लेखाशीर्ष :

| मागणी क्र. ओ-८ | | Demand No.O-८ | |
|---|---|---|---|
| ३४५२ | पर्यटन | 3452 | Tourism |
| ०१ | पर्यटनासाठी पायाभूत सुविधा | 01 | Tourist Infrastructure |
| १०१ | पर्यटन केंद्र | 101 | Tourist Centres |
| ०० | | 00 | |
| (००) (१६) | "तीर्थक्षेत्र व पर्यटनस्थळ विकास आराखडा" (कार्यक्रम/दत्तमत) ( ३४५२३०६६) | (00)(16) | "Pilgrimage And Tourism Destination Development Plan" (Scheme/Voted) ( 34523066) |

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०६२११५००५२६७१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDKUMAR GANGARAM RAUT

Digitally signed by NANDKUMAR GANGARAM RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=2364c4585e9e2f4e1a3eb4e4ad8e29fd11241a0ac1929b933f28fc39d2906d11, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=EFAB5769910D3540376EC2062B6C2A6B1BD6E7BC121FF37D75E24F4318761C66, cn=NANDKUMAR GANGARAM RAUT
Date: 2024.06.21 15:14:01 +05'30'

**(नंदकुमार राऊत)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य-१,मुंबई.
२. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य-२, नागपूर.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. विभागीय आयुक्त, पुणे
५. जिल्हाधिकारी, सातारा
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा
७. जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा
८. जिल्हा नियोजन अधिकारी, सातारा
९. कार्यासन व्यय-८/अर्थ-१६, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवडनस्ती.